२

२०१४०८२११५२३१७२९२३

**श्रीक्षेत्र हरिहरेश्वर व दिवेआगर पर्यटनस्थळ विकासासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००४/५ /प्र.क्र. २५०/पर्यटन,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक - २२ सप्टेंबर २००९.**

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००४/५ /प्र.क्र. २५०/पर्यटन, दि. २१ ऑगष्ट २००४
२) जिल्हाधिकारी, रायगड यांचे पत्र क्र. नियोजन/कार्या-५/पर्यटन१३१८/२००९/दि.३१/०८/२००९.
३) शासन निर्णय क्र. टिडीएस २००८/प्र.क्र.४४२/पर्यटन, दि. २४/२/२००९
४) जिल्हाधिकारी, रायगड यांचे पत्र क्र. नियोजन/कार्या-५/पर्यटन१३५२/२००९/दि.१६/०९/२००९.

**शासन निर्णय :**

शासन निर्णय क्र. एमटीसी२००४/५/प्र.क्र.२५०/पर्यटन दि. २१ ऑगष्ट २००४ अन्वये पर्यटनस्थळ विकासाअंतर्गत श्री क्षेत्र हरिहरेश्वर येथील कामांसाठी रु. १२१२.०० लाख व श्री क्षेत्र दिवेआगर येथील कामांसाठी रु. ९५३.०० लाख मिळून रुपये २१६५.०० लाख इतक्या रक्कमेच्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देवून श्री क्षेत्र हरिहरेश्वरसाठी रु. ५००.०० लाख व श्री क्षेत्र दिवेआगरसाठी रु. ३००.०० लाख इतका निधी वितरीत केला होता.

श्री क्षेत्र हरिहरेश्वर व श्री क्षेत्र दिवेआगर येथील पुर्ण झालेल्या कामांच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी रायगड यांनी प्रलंबित देयके अदा करण्यासाठी रुपये १२५.०० लाखाची मागणी केली आहे. त्यामुळे सदर मागणीच्या अनुषंगाने खालील नमूद केलेल्या कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी रु. १२५.०० लाख निधी उपलब्ध करुन खर्च करण्यास शासन मंजूरी देत आहे.

**१) श्री. क्षेत्र हरिहरेश्वर**

(रुपये : लाखात)

| क्र. | कामाचे नांव | वितरीत निधी |
|---|---|---|
| १. | हरिहरेश्वर मंदिर परिसर (मंदिराचा विकास, परिक्रमा मार्ग इ.) | ३.०८ |
| २. | धर्मशाळा व परिसर | २.०० |
| ३. | अस्थिविसर्जन परिसर (अस्थि विसर्जनसाठी घाटाचे बांधकाम, वॉटर स्पोर्टसाठी जेट्टी इ.) | ८.०० |
| ४. | इन्फ्रास्ट्रक्चर (रस्ते विकास, गटारांचे बांधकाम, वीज व नवीन रस्त्याचे बांधकाम) | १८.४२ |
| ५. | भूमी सुधारणा | ३.०८ |
| | **एकूण** | **३४.५८** |

**२) श्री क्षेत्र दिवेआगर परिसराची सुधारणा**

(रुपये : लाखात)

| क्र. | कामाचे नांव | वितरीत निधी |
|---|---|---|
| १. | पंचमुखी महादेव मंदिर विकास | २७.५० |
| २. | रुपनारायण मंदिर | १७.२७ |
| ३. | इन्फ्रास्ट्रक्चर (रस्त्याची सुधारणा इ.) | ४३.१५ |
| ४. | स्मशान भूमी परिसर | २.५० |
| | **एकूण** | **९०.४२** |

श्रीक्षेत्र हरिहरेश्वर येथील कामे पुर्ण करण्यासाठी **रु. ६१९.५२ लाख** व श्रीक्षेत्र दिवेआगर येथील पुर्ण करण्यासाठी **रु. ४८०.४८ लाख** असे एकूण **रु. ११००.०० लाख** इतका निधी वितरीत करणे आवश्यक आहे. या निधीतून पुर्वी केलेल्या कामाचे देयके अदा करावयाचे आहेत.

सन २००८-०९ या वित्तिय वर्षात श्रीक्षेत्र हरिहरेश्वर व श्रीक्षेत्र दिवेआगर येथील कामे पुर्ण करण्यासाठी रुपये ११,००,००,००० (रुपये :अकरा कोटी फक्त) तरतूद करण्यात आली होती. सन २००८-०९ या वित्तिय वर्षात पर्यटन स्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा विकासासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीतून म्हणजेच रु. ८०१६.०० लाख निधीमधून शासन निर्णय क्र. टिडीएस २००८/प्र.क्र.४४२/पर्यटन, दि.२४/२/२००९ अन्वये महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास रु. ७३२१.१३ लाख वितरीत केला आहे. महामंडळास वितरीत केलेल्या रुपये ७३,२१,१३,००० (रुपये : त्र्याहत्तर कोटी एकवीस लाख तेरा हजार फक्त) इतक्या निधीतून वरील कामांचे देयके अदा करण्यासाठी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने जिल्हाधिकारी, रायगड यांना रु. १२५.०० लाख (रुपये : एकशे पंचविस लाख फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास शासन निर्णय, क्रमांक एमटीसी २००४/५ /प्र.क्र. २५०/पर्यटन, दि. २१ ऑगष्ट २००४ च्या मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून शासन मंजूरी देत आहे.

**अटी व शर्ती :**

१) महामंडळाने त्यांना वितरीत केलेल्या निधीतून जिल्हाधिकारी, रायगड यांना निधी वितरीत करावा.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकाऱ्यांवर राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २००८-०९ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष **"मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०१) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना यांना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहाय्यक अनुदाने"** या लेखा शिर्षाखाली मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेअंतर्गत) सहाय्यक अनुदानाची रक्कम **महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने, जिल्हाधिकारी, रायगड यांना वितरीत करण्यात यावी.**

४) हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-एक, शासन निर्णय क्र. विअप्र१०.०८/प्र.क्र.७०/२००८, दि.१५ मे २००९ मधील अनु. क्र. २७ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारातंर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(आ. वा. डमाळे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, सां.का-३, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.